एका पदावरून दुस-या नवीन पदावर नियुक्त होत असताना त्या दुस-या पदावरील कर्तव्ये आणि जबाबदा-या पहिल्या पदापेक्षा अधिक नसतील तेव्हा करावयाची वेतननिश्चिती व त्यासाठी द्यावयाचा विकल्प.

---

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग,
शासन निर्णय क्रमांक: वेतन १२८९/प्र.क्र.४६/सेवा-३,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ३ एप्रिल १९९०.

## शासन निर्णय

एका पदावरून दुस-या नवीन पदावर नियुक्ती झाल्यावर जेव्हा दुस-या पदावरील कर्तव्ये आणि जबाबदा-या पहिल्या पदापेक्षा अधिक नसतात तेव्हा करावयाची वेतन-निश्चिती व त्यापुढील देय वेतनवाढ ह्यासंबंधीची तरतूद महाराष्ट्र नागरी सेवा [वेतन] नियम, १९८१ मधील नियम ११[२] मध्ये करण्यात आलेली आहे. त्याअन्वये नवीन पदाच्या वेतनश्रेणीमध्ये शासकीय कर्मचा-याचे वेतन नवीन पदाच्या वेतनश्रेणीमध्ये जुन्या पदाच्या वेतनाएवढ्या रकमेचा टप्पा असल्यास त्याच समान टप्प्यावर निश्चित करण्यात येते, अथवा जर नवीन पदाच्या वेतनश्रेणीमध्ये त्याच्या जुन्या पदाच्या वेतनाएवढ्या रकमेचा टप्पा नसेल तर त्या जुन्या पदाच्या वेतनाच्या लगतपूर्वीच्या टप्प्यावरील वेतन अधिक त्या दोहोमधील फरकाच्या रकमेइतके वैयक्तिक वेतन देण्यात येते. वरील दोन्ही बाबतीत त्याला जुन्या पदाच्या वेतनश्रेणीमधील वेतनवाढ जेव्हा मिळू शकली असती ती तारीख, किंवा नवीन पदाच्या वेतनश्रेणीतील वेतनवाढ जेव्हा देय होईल ती तारीख, यापैकी अगोदरची असेल त्या तारखेस त्याला पुढील वेतनवाढ मिळते.

२. वरीलप्रमाणे वेतननिश्चिती करताना जे वैयक्तिक वेतन देण्यात येते त्यामुळे शासकीय कर्मचा-याचे नुकसान होते, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. म्हणून विचारांती शासनाने असा निर्णय घेतला आहे की, जेव्हा एखादा शासकीय कर्मचारी एका पदावरून दुस-या नवीन पदावर नियुक्त होतो व अशा नवीन पदाला पूर्वीच्या जुन्या पदापेक्षा अधिक महत्वाची कर्तव्ये आणि जबाबदा-या नसतील, तेव्हा [अ] जर जुन्या पदाच्या वेतनश्रेणी-मधील समान वेतन टप्पा त्याच्या दुस-या नवीन पदाच्या वेतनश्रेणीमध्ये असेल तर त्या समान टप्प्यावर त्याचे वेतन निश्चित करावे व त्याची पुढील वेतनवाढ जुन्या पदावरील वेतनवाढीच्या दिनांकास द्यावी, अथवा [ब] तसा समान टप्पा नवीन पदाच्या वेतनश्रेणीत नसेल तर नवीन पदाच्या वेतनश्रेणीमधील जो वेतन टप्पा त्याच्या जुन्या पदाच्या वेतनाच्या लगतनंतरचा असेल त्या टप्प्यावर त्याचे वेतन निश्चित करण्यात यावे व याप्रमाणे वेतन-निश्चिती केल्यावर त्या कर्मचा-याची नवीन पदावरील पुढील वेतनवाढ नवीन पदाच्या वेतनश्रेणीत आवश्यक तो अर्हताकारी कालावधी पूर्ण केल्यावर देण्यात यावी.

शाममु. रोटा-विवि-एच-१४९[१०,०००+१०-४-९०]

नवीन पदाच्या वेतनश्रेणीतील किमान वेतन जर त्याच्या जुन्या पदावरील वेतनापेक्षा अधिक असेल तर त्याचे नवीन पदाच्या वेतनश्रेणीतील किमान वेतन प्रारंभिक वेतन म्हणून निश्चित करण्यात यावे.

३. या तरतुदीनुसार कनिष्ठ कर्मचा-यास त्याच्या पहिल्या पदाच्या वेतनातील वेतनवाढ मिळाल्यानंतर दुस-या पदावर नियुक्ती मिळाल्यास, त्या कर्मचा-याला त्याच्यापेक्षा ज्येष्ठ असलेल्या कर्मचा-याच्या वेतनामध्ये, जरी असा ज्येष्ठ कर्मचारी त्याच्यागोदर नियुक्त झाला असेल व त्याने आपल्या कनिष्ठ कर्मचा-यापेक्षा कधीही कमी वेतन घेतलेले नसेल तरी विसंगती निर्माण होण्याची शक्यता आहे. त्याबाबतीत विचारांती शासन असा आदेश देत आहे की, शासकीय कर्मचा-याची एका पदावरून अशा दुस-या नवीन पदावर नियुक्ती झाल्यानंतर वेतननिश्चितीच्या बाबतीत त्याला खालील-प्रमाणे विकल्प देण्यात यावा:-

[अ] एका पदावरून दुस-या नवीन पदावर नियुक्ती होत असताना वेतननिश्चिती एकतर नवीन पदावरील नियुक्तीच्या दिनांकापासून करावी -

किंवा

[ब] जुन्या पदावरील वेतनश्रेणीमधील नेहमीच्या वेतनवाढीच्या दिनांकापासून वेतननिश्चिती करावी.

ह्या आदेशाची अंमलबजावणी दिनांक १ जानेवारी १९८६ पासून करण्यात यावी. दिनांक १ जानेवारी १९८६ किंवा त्यानंतर आणि हा शासन निर्णय निर्गमित होण्याच्या दिनांकापर्यन्त जे कर्मचारी यापूर्वीच तत्सम दुस-या नवीन पदावर नियुक्त झाले असतील, त्यांना सदर शासन निर्णय निर्गमित होण्याच्या दिनांकापासून जास्तीत जास्त तीन महिन्यांचा कालावधी विकल्पासाठी देण्यात यावा. त्यानंतर, ज्या कर्मचा-यांना पहिल्या पदावरून दुस-या तत्सम पदावर नियुक्ती मिळेल त्यांना या शासन आदेशानुसार त्यांचे वेतन निश्चित करून घेण्यासाठी विकल्प देण्यास त्यांच्या नवीन पदावरील नियुक्तीच्या दिनांकापासून एक महिन्याचा कालावधी देण्यात यावा. दोन्ही प्रकरणां-मध्ये एकदा दिलेला विकल्प अंतिम समजण्यात यावा. राजपत्रित अधिका-याने आणि अराजपत्रित शासकीय कर्मचा-याने आपला विकल्प कार्यालय प्रमुखांकडे विहित मुदतीच्या आत पाठवावा. सदर विकल्प विहित मुदतीच्या आत दिला नाही तर त्या शासकीय कर्मचा-याने दुस-या नवीन पदावरील नियुक्तीच्या दिनांकापासून वेतननिश्चितीचा विकल्प दिला असे समजण्यात यावे व त्याप्रमाणे दुस-या पदावरील वेतनश्रेणीमध्ये वेतन निश्चित करण्यात यावे. विकल्पाचा नमुना सोबत जोडला आहे.

४. ह्या आदेशानुसार वेतन पुनर्निश्चित केल्यामुळे द्यावी लागणारी दिनांक ३१ डिसेंबर १९८९ पर्यन्तची थकबाकी संबंधित व्यक्तीच्या भविष्य निर्वाह निधीमध्ये जमा करण्यात यावी.

५. यापुढे, ज्या शासकीय कर्मचा-यांची अशा प्रकारच्या पदावर नियुक्ती करण्यात येईल त्यांच्या नियुक्तीचे आदेश काढताना त्या आदेशामध्ये या शासन निर्णयातील

आदेशानुसार कर्मचाऱ्याने वेतन निश्चितीसंबंधीचा आपला विकल्प नियुक्तीच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत द्यावा व असा विकल्प न दिल्यास त्याचे नवीन पदावरील नियुक्तीच्या दिनांकापासून वेतननिश्चितीचा विकल्प दिला असे समजण्यात येईल, असा परिच्छेद न चुकता घालावा आणि सोबत विकल्पाचा नमुना जोडावा.

६. महाराष्ट्र नागरी सेवा [वेतन] नियम, १९८१ च्या संबंधित नियमांमध्ये आवश्यक त्या सुधारणा यथावकाश करण्यात येतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. ना. कुलकर्णी,
उप सचिव, वित्त विभाग.

प्रति

महालेखापाल–१ [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल–२ [लेखा व अनुज्ञेयता], महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल–१ [लेखा परीक्षा], महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल–२ [लेखा परीक्षा], महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
x प्रबंधक, उच्च न्यायालय [मूळ न्याय शाखा], मुंबई,
x प्रबंधक, उच्च न्यायालय [अपील शाखा], मुंबई,
x सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
x सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
x प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय [व्यय विभाग], खोली क्रमांक २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
उप मुख्य लेखापरीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी,

एच–१४९[१०,०००+१०–४–९०]–२

सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, वित्त विभाग, सेवा-३.

× पत्राव्दारे
१९९० चा क्रमांक
माहिती व मार्गदर्शनाकरिता प्रत रवाना.

[शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: वेतन १२८९/प्र.क्र. ४६/सेवा-३, दिनांक ३ एप्रिल १९९० चे सहपत्र].

## जोडपत्र

### विकल्पाचा नमुना

[परिच्छेद ३ पहा]

१ [अ] मी श्री./श्रीमती/कुमारी ..............................................
याव्दारे १ जानेवारी १९८६ पासून/नियुक्तीच्या दिनांकापासून माझ्या नवीन पदावरील रु. ..............................................
.............................. वेतनश्रेणीची निवड करतो/करते.

२ [ब] मी श्री./श्रीमती/कुमारी ..............................................
याव्दारे माझी विद्यमान वेतनश्रेणी रु. ..............................
.............................. दिनांक ..............................
.............................. पर्यन्त चालू ठेवण्याची निवड करतो/करते.

सही ..............................
नाव ..............................
पदनाम ..............................
कार्यालय ..............................

दिनांक :
ठिकाण :

× जे नको असेल ते खोडावे.

[redacted]]